**राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेचा सन २०२१-२२ करिता निधी वितरीत करण्याबाबत.. (४४०६-००५३).**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२१/प्र.क्र.४४१/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २० ऑक्टोबर, २०२१.

**वाचा :-**

१. अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२१/९०/२०२१-२२, दिनांक २२.०६.२०२१.
२. शासन निर्णय समक्रमांक दिनांक ७.०७.२०२१.

**प्रस्तावना :-**

"राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सीमांकन" (४४०६ ००५३) या राज्य योजनेअंतर्गत सन २०२१-२२ साठी एकूण रु. १५००.०० लक्ष इतका निधी नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

**२.** मौजे मरोळ, मरोशी, आरे व गोरेगाव येथील राखीव वन म्हणून घोषीत क्षेत्राच्या सर्व्हेक्षण व सिमांकन करण्याकरिता, नगर भूमापन क्रमांकाची मोजणी फी अदा करण्यासाठी आवश्यक रु. १९४.८५ लक्ष निधी उपलब्ध करुन अर्थसंकल्प प्रणालीवर (BDS) वितरीत करण्याचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दिनांक २२.०६.२०२१ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला होता.

**३.** त्यानुषंगाने मौजे मरोळ, मरोशी, आरे व गोरेगाव येथील वनक्षेत्राच्या सर्व्हेक्षण व सिमांकन करण्याकरिता, नगर भूमापन क्रमांकाची मोजणी फी अदा करण्यासाठी आवश्यक रु. १९४.८५ लक्ष निधीपैकी "राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सीमांकन" (४४०६ ००५३) या राज्य योजनेअंतर्गत सन २०२१-२०२२ साठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या एकूण रु. १५००.०० लक्ष नियतव्ययापैकी २७- लहान बांधकामासाठी अर्थसंकल्पित रु. ३१५.०० लक्ष नियतवयातून ५० % निधी खर्च / वितरणास करण्यास वित्त विभागाने सहमती दर्शविली होती. त्यानुसार सदर कामासाठी आवश्यक रु. १९४.८५ लक्ष निधी पैकी वितरणासाठी उपलब्ध असलेले रु. १५७.५ लक्ष निधी या विभागाच्या दिनांक ७.०७.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

**४.** आता, या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या रु. १५००.०० लक्ष (०२ मजूरी- रु. २५५.०० लक्ष, २७-लहान बांधकामे- रु.३१५.०० लक्ष व ५३ मोठे बांधकामे - रु. ९३०.०० लक्ष) निधी पैकी वित्त विभागाच्या अर्थसंकल्पिय प्रणाली प्रमाणे योजनेच्या ०२- मजूरी या उपशिर्षाखाली रु. १२७.५० लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. मौजे मरोळ, मरोशी, आरे व गोरेगाव येथील राखीव वन म्हणून घोषीत क्षेत्राचे सर्व्हेक्षण व सिमांकन करण्याकामी ०२ मजूरी या उदिष्टांतर्गत उपलब्ध निधीतून रु. ३७.३५ लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२१-२२ करिता "राखीव वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन" (४४०६ ००५३) या योजनेअंतर्गत एकूण रु. १५००.०० लक्ष अर्थसंकल्पीत निधीच्या मर्यादेत प्रस्तावांतर्गत मौजे मरोळ, मरोशी, आरे व गोरेगाव येथील राखीव वन म्हणून घोषीत क्षेत्राच्या सर्व्हेक्षण व सिमांकन करण्याकामी ०२ मजूरी या उदिष्टांतर्गत उपलब्ध निधीतून रु. ३७.३५ लक्ष इतका निधी पुढील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.

२) यामध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.

३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.

४) सदर मान्यता ही सन २०२१-२२ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.

५) सदर बांधकाम करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

२. सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२१-२२ मध्ये मंजूर अर्थसंकल्पित अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२०१६३३५९९११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2021.10.20 16:37:38 +05'30'

**(अरविंद आपटे)**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५) वनसंरक्षक तथा संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.

६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.

७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.